नवसाक्षर साहित्यमाला

# लतेची वाटचाल

गार्गी चक्रवर्ती

अनुवाद

विलास गिते

चित्रे

नीता गंगोपाध्याय





नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया



आई कामात आहे. लता जवळ बसून पाहते आहे.

# लतेची वाटचाल

बंगालमधले एक खेडे गाव. गावाचं नाव हालतू. गावाच्या उगवतीला एक मोठा तलाव. तलावाचं नाव सोनादिघी. घाटाला लागून एका रांगेत घरं. घरं गवताने शाकारलेली. काही घरं मातीची. या घरांत बरीच कुटुंबं रहातात. नकुलचंही कुटुंब अशाच एका घरात रहातं.

नकुल मजूर आहे. रोजंदारीवर काम करतो. कुदळ आणि घमेलं घेऊन बाहेर पडतो. दिवसभर काम करतो. या वाडीत आणखीही मजूर रहातात. ते सगळे बरोबरच कामाला जातात.

नकुलच्या कुटुंबात बायको आणि तीन मुली आहेत. आई-वडील कधीच देवाघरी गेले आहेत. नकुलची बायकोही काम करते. नोकरदार लोकांच्या घरी जाऊन भांडी घासते. घरं झाडते. कपडे धुते. तिला एक नाव आहे हे खरं. पण ते नाव तीही विसरून गेली आहे. वाडीतले लोक तिला 'वहिनी' अशी हाक मारतात.

तिला तीन मुली आहेत. उषा आणि उमा, दोघीही शहरात रहातात. नोकरदारांच्या घरी काम करतात. तिथेच जेवतात. तिथेच रहातात. अधूनमधून घरी येतात.

धाकटी मुलगी लता. तिचं वय पाच. मोठे मोठे डोळे. लांब-लांब केस. लता आईचं शेपूट आहे. आई घरोघरी कामे करते. लता आईबरोबर बसून पहाते. दिवसामागून दिवस उलटतात. काळ पुढे जात रहातो.



एके दिवशी सकाळी वहिनी तलावाकडे गेली. माघातील थंडी. सगळीकडे धुकं पसरलेलं. नकुल अगदी पहाटेच बाहेर पडला होता. वहिनीला आता लताला बरोबर घेऊन कामाला निघायचं होतं. थंड पाण्याने हात-तोंड धुऊन ती घरी आली. बघते तर काय ? लता घरात नाही. इकडं पाहिलं, तिकडं पाहिलं. आसपास शोधलं. खूप हाकाटी केली. 'लता गं लता, गेलीस कुठं ?'

मनात विचार आला, काय संकटात टाकलंय् पोरीनं ! कामाला जायची वेळ. उशीर होत चाललाय्. पण लता काही कुठं दिसत नाहीय्.

कुठं गेली पोरगी ? वहिनी रडू लागली. वाडीतले लोक जमले. कुठं बरं गेली असेल लता ? तलावात तर नाही ना बुडाली ?

शेजारचा रतन धावत आला.

'लता सापडली बरं का !'

वहिनीच्या जिवात जीव आला. तोंडावर हसू फुटलं.

'कुठं ?'

'मुलींच्या शाळेत.'

हे ऐकून वहिनीला राग आला. क्षणात डोळ्यांतलं पाणी सुकून गेलं. हसू मावळलं. 'धुणं-भांडी केली तर खायला मिळेल. लिहिणवाचणं शिकून



'लता, ए लता. गेली तरी कुठे बरं ही ?'

काय होणार ?' असं पुटपुटत वहिनी निघाली.

सोनादिघी तलावाजवळच शाळा आहे. एक मोठी खोली. पुढे खेळायचं मैदान. चारीकडून कुंपण. एक लाकडी फाटक. ते उघडून वहिनी सरळ पुढे गेली. समोरच शाळेची खोली. दरवाजा उघडा. लता बाईंजवळ बसलेली होती. आईला पाहून तिला भीती वाटली. मोठा अपराध केला आहे, असं वाटलं.

'घरी चल !' वहिनी म्हणाली.

बाईंनी लताला जाऊ दिलं नाही. उलट वहिनीला सांगितलं, 'वहिनी, कामाला जाताना लताला का बरोबर नेता ? तिला शाळेत येऊ देत जा. लिहिणंवाचणं शिकू देत. पुढं शिक्षणाचा उपयोग होईल.'



'घरी चला' वहिनी ओरडली.
बाईंनी लताला जाऊ दिले नाही.

# सोना

सुटीची घंटा वाजली. ठण् ठण् ठण् ! लहान-लहान मुलींचे घोळके बाहेर आले. आपसात बोलू लागल्या – जणू पाखरांची किलबिल. मुलींत लताही होती.

तलावाकाठाने लता निघाली. शाळेत. डुलत डुलत चाललीय्. हातात वही - पुस्तक. शाळेत बाई कितीतरी गोष्टी सांगतात. किती छान शिकवतात. जगाचा इतिहास. माणसाचा इतिहास. हिशेब.

आज लताला खूप आनंद झाला आहे. आज तिने पहिलं वाक्य लिहिलं आहे. तोंडाने बोलणं एक, आणि ते नीट लिहिणं एक. लताच्या तोंडावरून आनंद नुसता ओसंडून वाहतोय. नवीन काहीतरी शिकायला मिळाले याचा आनंद !

नाचत-नाचत, मान डोलवत लता चालली होती. आई-वडिलांना लिहिणंवाचणं येत नाही. लिहिणं-वाचणं काय असतं हे घरी जाऊन कुणाला समजावून सांगणार ?

याच वेळी तिच्या वाडीतील राणूताईने हाक मारली.

‘अगं ए लता, लवकर घरी जा ! तुला भाऊ झालाय !’

लताला खूप आनंद झाला. धावतच ती घरी गेली.

आई अंथरुणावर झोपली आहे. जवळ इवलसं बाळ. अगदी बाहुलीसारखं.

वाडीतील शेजारणीही बाळ पहायला आल्या आहेत. आनंदाने हसत आहेत. सगळेच खुश आहेत. आई खुश. बाबा खुश. मागं अनेकदा लताने आईला नशिबाला बोल लावताना ऐकलंय – 'माझं नशीबच फुटकं ! लेकाचं तोंड पहाणं माझ्या नशिबात नाही !'

आज तिला खूप आनंद झाला आहे हे लतालाही समजतं. 'शेवटी देवाने दया केली !' बाबा हारुकाकाला सांगत आहेत.

'मरण आलं, तर चिता पेटवायला मुलगा आहे आता !'



भावाला पाहून लता आनंदाने नाचू लागली.

भावाचं नाव ठेवलं सोना. अगदी सोनेरी रंगाचा चांदच जणू ! तीन मुलींनंतर झालेला हा मुलगा. पहिला मुलगा. कितीतरी दिवसापासून नकुल आणि वहिनीला मुलाची आस लागली होती. ती आशा पुरी झाली.

लता आनंदाने नाचू लागली. लहानशा हातांत भावाला उचलायला बघू लागली. जिवंत बाहुलीच जणू ! किती मजा ! आता आपण भावाशी खेळू ! ती खूप खूप बेत रचू लागली. विचार करू लागली.

एक महिना पुरा झाला नाही, तोच वहिनी कामाला जाऊ लागली. वाडीतले लोक आता तिला 'सोनाची आई' म्हणून हाक मारू लागले. वहिनीला ही हाक खूप गोड वाटू लागली. खरंच, ती सोनाची आई आहे. मुलाची आई होणं किती नशिबाचं.

सकाळपासून पाऊस पडत होता. ढग आले होते. तरी वहिनीला कामाला जायलाच हवं. लता शाळेची तयारी करत होती. आईचे बोलणे ऐकून ती दचकली.

'लता, यापुढे शाळेत जायची गरज नाही. भावाला कोण बघणार ?' आता तिलाच सोनाला सांभाळावे लागणार होते.

लताचा भोळा चेहरा सुकून गेला. डोळे भरून आलेत. शाळेची आठवण येऊन काळीज तुटू लागलं.

ती मनात विचार करू लागली. हे काय झालं ! इथून पुढे मला शिकता येणार नाही ? ती रडू लागली. हे आईने बघू नये यासाठी लता तलावाकडे पळून गेली.

पाऊस थांबला. श्रावणातलं आभाळ. झाडांवरुन टपटप पाणी पडत होतं. घाटावर बसून लता रडू लागली. पाऊस थांबला, पण तिचं रडणं थांबेना. हुंदके देऊन देऊन लता रडत होती.



'तू यापुढे शाळेत जायचं नाही.
भावाला कोण सांभाळेल ?'

मग कितीतरी महिने उलटले. कितीतरी पावसाळे निघून गेलेत. सोना हळूहळू मोठा होत होता. तो आता नकुल आणि वहिनीचा फारच लाडका झाला होता.

सोनाला दूध मिळे. केळी मिळत. असं मुलींच्या नशिबात नसतं. लतालाही दूध आवडते. सोनाला घुटूघुटू दूध पिताना लता पाही. सोना खूप लाडाचा आहे हे तिला समजते. सोनासाठी सगळं वेगळं. हीच जणू रीत आहे. लताला हे सगळे सहज अंगवळणी पडले आहे. नवरात्र आले. देवीपुढे ढोल वाजू लागला. नकुल पुजेचं सामान आणायला बाजारात गेला. तो सोनासाठी चिटाचा सदरा आणि विजार घेऊन आला. लतासाठी लाल रिबीन आणली. पण लताला कापड मिळाले नाही. कारण पैसे पुरले नाहीत.



कपडे मिळतील अशी लतालाही आशा नव्हती. दसरा येई, दिवाळी येई. दर साली लताला कधीच नवे कपडे मिळाले नाहीत.

सोनाला नवे कपडे घालून लताने देवीच्या मंडपात नेले. आपल्या भावाने नवे कपडे घातले आहेत, यातच तिला आनंद आहे. जणू तिनेच नवे कपडे घातले आहेत. सोनावर लताचा भारी जीव.

सोनाची कामे करण्यात लताचा दिवस जाई. सोना सहा वर्षांचा झाला. नकुल आणि वहिनींना सोनाला कुठे ठेऊ आणि कुठे नको असे झाले आहे. नकुलने नवी पाटी आणली. बोटाला धरून सोनाला शाळेत नेलं.

नकुलने कितीतरी बेत केले होते. सोना मोठा होईल. लिहिणंवाचणं शिकेल. नोकरदार बनेल. हापिसात काम करील.

लता आपली जुनी पुस्तकं पाही. त्यांच्यावरची धूळ झाडी. पुस्तकं जपून ठेवी.

सोना लिहिणंवाचणं शिकणार. लतालाही खूप आनंद झाला. आपण शाळेत जाऊ शकत नाही याचं तिला वाईट वाटेनासं झालं. दिवसभर ती घरातलं काम करी. आता ती बारा वर्षांची झाली. ती रांधप वाढप करू लागली. ती भांडी घाशी. वहिनी परत येण्याआधी सगळं नीट करून ठेवी. पाहता पाहता लता मोठी झाली.

सोनाला नवे कपडे घालून
लताने पूजेला नेले.



# विवाह

एकदा लता तलावाकाठी धुणं धूत होती. आई परतायची वेळ झाली होती. लताला कामाची घाई झाली होती. सोनाही शाळेतून यायचा होता.

तोच वाजंत्रीचा आवाज आला. लताने वळून पाहिलं. वाटेने वरात



वाजंत्रीचा आवाज आला
लताने वळून पाहिले.

चालली होती. वाजंत्रीमागे रिक्षात वधू-वर होते. रिक्षाबरोबर लोक चालले होते. कुठली मुलगी कुठं चालली होती, कोण जाणे ! ते पाहताना लताला खूप मजा वाटली. रिक्षा दूर जाईतोवर ती पहात राहिली.

एक दिवस तिलाही असं सासरी जावं लागणार, हे लताला ठाऊक नव्हतं.

काही दिवसांनी तिला कुणीतरी पहायला आले. असे तर अधूनमधून लोक येत असत. पण या वेळी आई खूप खुश होती. लताचं लगीन ठरलं.

फाल्गुन महिन्यात विवाह. वहिनी रोजच काही ना काही जिनसा विकत आणी. लतासाठी नवी लाल साडी आणली. हिरवा चुडा आणला. मेंदी आणली. कुंकू आणलं. बासनं आणली. सगळं काही लतासाठी.



लताला नीट समजत नव्हतं. यालाच बहुतेक लगीन म्हणत असावेत. हीच तिची पहिली नवीन साडी. तिला खरेच वाटेना.

वहिनी काही दिवसांपासून खूपच हळवी झाली होती. ती आता लताशी खूप मायेने बोले. असं लताने या आधी कधी पाहिलं नव्हतं. आईच लताच्या केसांना तेल लावी. तिची वेणी घालून देई. लताला काही कळत नव्हते.

बघता बघता विवाहाचा दिवस उजाडला. लताची थोरली बहीण उषा.

तिचे गाव दूर होते. साहेबांकडे काम करीत होती. यामुळे तिला येता आलं नाही. तिचं अजून लगीन झालेलं नाही. मधली बहीण उमा हिचं आधीच लगीन झालंय. ती आज आली.

वहिनीने खूप पहाटेच लताला उठवलं. वाडीतील आयाबाया गाणं गात पाणी आणायला गेल्या. लता ही नवलाई चकित होऊन पहात होती.



आज लताचा विवाह. आयाबाया तिला सजवत आहेत.

आज तिचा विवाह. वाडीतील आयाबायांनी त्या पाण्याने तिला न्हाऊ घातलं. पायांना अळिता लावला.

घरासमोर मोकळी जागा होती. उमाताईने तिथं रांगोळी काढली. तिथेच लताचं लगीन लागणार.

वाडीतील सगळेजण आले. भात-माशांचे रांधण तयार झाले. छोटी मुलं केळीची पानं धुऊ लागली.

बघता-बघता सांज झाली. वसंतातला गार गार वारा वाहू लागला. सगळे म्हणाले, 'आला हो, नवरदेव आला. त्याला ओवाळा. उलू-उलू आवाज करा.'

आकाशात चांदणी उगवली. लताला बाहेर आणलं. नवरा-नवरींनी एकमेकांच्या गळ्यात हार घातले. मग होम झाला. न समजणारे मंत्र. पुरोहिताचं काम संपलं.

लताचं लगीन पार पडलं. एका अनोळखी तरुणाबरोबर. यापुढे त्याच्याबरोबरच रहावं लागणार. आता हाच आपला नवरा, हे लताला समजलं.

दुसऱ्या दिवशी लता सासरी रवाना झाली. नव्या माणसासंगे. तो कुठे रहातो, काय करतो, हे लताला काहीच ठाऊक नाही.

तरीही ती त्याच्याबरोबरच रिक्षात बसते. मन भरून आलंय. आता सोनाला सोडून जायचं. आई, बाबा, ताई — सगळ्यांना सोडून जायचं. नेहमीचा तलावाचा काठ, पेरूचा बाग, आमराई सगळं सगळं सोडून जायचं. लता रडू लागली.

आई, बाबा, भाऊ, ताई, वाडीतले लोक-सगळेच रडू लागले. सगळे

लतासाठी रडू लागले. सगळेच लतावर माया करणारे. लग्नाची सगळी मजा जणू संपली !

लताची रिक्षा चालू लागली. वाजंत्रीसाठी बाबांकडे पैसे नव्हते. आयाबाया पदराने डोळे पुसू लागल्या. सोना हुंदके देऊन देऊन रडू लागला. ताईला सोडून तो कसा रहाणार ?

हळू हळू रिक्षाचा वेग वाढला. मागची माणसं रिक्षाबरोबर जाऊ शकली नाहीत. ती सगळी तिथेच थांबली. लता निघाली. लता दूरदूर चालली गेली. बरोबर नवरा होता. नवीन गावाला निघाली होती. गावाचं नाव तिला ठाऊक नाही. तरीही निघाली होती. असेच जावे लागते, हे तिला ठाऊक आहे.

आज जणू कालचा आनंद संपून गेलाय. नवीन साडी, नवा चुडा यांची खुशी ओसरून गेली. काळजात रडू दबलेलं. आई, बाबा, भाऊ, बहिणी यांना सोडून रहायची वेदना. सोनाला सोडून ती कशी काय रहाणार ?

रिक्षा फलाटाकडे जाऊन थांबली. लता नवऱ्याबरोबर रिक्षातून उतरली. सोबत तीन-चार वऱ्हाडी माणसे होती. लताचा चेहरा पदरात लपलेला होता. नवऱ्याचे अंग तिला दिसत होते. पण चेहरा तेवढा दिसत नव्हता. आगगाडीत बसून लता नवीन गावी आली.

लताने फलाटावर नाव वाचलं — 'आमतला'. काही मैल पायी चालून दोघेजण गावात आले.

नवरा नवरीचं स्वागत झालं. शंख वाजला. 'उलू-उलू' असा आवाज झाला. सांज होत आली होती. मातीने सारवलेलं अंगण. गावातील पोरीबाळी, बायकांनी दाटीवाटी केली होती. बारकाईने लताकडे बघणे चालले होते.



लता सासरी निघाली आहे. नवे ठिकाण !

सारे काही सोडून ती आली होती. पण आता वियोगाची सल कमी झाली होती. नवी जागा, नवी माणसे. लता अगदी घाबरून गेली होती. आता लताला इथेच रहायचं आहे. यांनाच आपलंसं करायचं आहे.

लताने सासूबाईंना पाहिलं. तिला वाटलं 'आई' म्हणून हाक मारावी. एका दिवसात लताचं जीवन कसं बदलून गेलं. बहुदा असंच होत असतं. लता मनात विचार करू लागली.



नवीन आईशी लताचे
मायेचे बंध जुळून आले.

# नवीन जीवन

काही दिवसांत लता या घरातलीच एकजण होऊन गेली. सहजपणे ती सासूला 'आई' अशी हाक मारी. जणू अगदी लहानपणापासूनच अशी हाक मारीत आलीय ती !

सासूचे वय झाले होते. त्यात तिला दम लागायचा. लिहिणंवाचणं येत नव्हतं. नवरा जाऊन बराच काळ लोटला होता.

पण सासू फार मायाळू होती. काही दिवसांतच तिने लताला आपलंसं केलं. लताला आजवर अशी ममता मिळाली नव्हती. घरी तिचं कौतुक होत नसे. ती होती तिसरी मुलगी-मुलगा नव्हे ! जणू कुणालाही नको असताना ती जन्माला आली होती.

आज या नवीन आईच्या मायेमुळे लताला खूप बरं वाटत होतं. सासू वाडीतील लोकांपासून लताचे दोष झाकून ठेवीत असे. लता जणू तिचीच मुलगी होती.

लताच्या पतीचं नांव होतं महेश. महेश रिक्षा चालवीत असे. उन्हात तापत, पावसात भिजत तो काम करी. मिळकतीतील काही पैसे रिक्षामालकाला देणे असायचे. मग हातात कितीसे पैसे उरणार ?

तरीही महेश विचार करे, आपण पैसे साठवू. रिक्षा विकत घेऊ. घराची डागडुजी करवून घेऊ. . .कितीतरी बेत करी ! माणूस आशेवरच जगतो. जीवन असेच चालते.

असेच दिवस उलटले. महिने गेले. पावसाळे गेले. लता आता आई बनली.

लताला मुलगी झाली.

वाडीतले सगळेजण म्हणत, ‘असू दे गं ! पुढच्या खेपेला मुलगा होईल !’

लताला असले बोलणे मुळीच आवडत नसे. तिचा आनंद लोकांना समजत नव्हता. लता खुश होती. महेशही खुश होता. एवढंच काय, म्हातारी आई पण खुश होती. ती म्हणे, ‘ही नात माझ्या घराची लक्ष्मी आहे.’ मुलीचं नांव ठेवलं लक्ष्मी.



लताला दुसरी मुलगी झाली.

लक्ष्मी तीन वर्षांची झाली. लताला दुसरी मुलगी झाली. तिचं नांव ठेवलं सरस्वती. लताला याही वेळी खूप आनंद झाला. तिला मुळीच निराशा वाटली नाही. ती ही तर एक मुलगीच होती ना !

यावेळी सासूला मुलगा हवा होता. पण लताची खुशी पाहून तिलाही आनंद झाला. ती म्हणाली, 'तुम्ही सुखासमाधानात राहिलात, म्हणजे झालं !'

लता विचार करी, लोकांना मुलगाच का हवा असतो ? मुलगी झाली तर आईपणाचं सुख काय कमी होतं का ?

लताला शिकण्याची संधी मिळाली नव्हती. सोनाला सांभाळण्यासाठी तिला शाळा सोडावी लागली होती. पण लताच्या मनाची घडण वेगळीच होती. विचार पुढारलेले होते.

महेशला लताने समजावलं. कुटुंब छोटं असलेलंच चांगलं. मुलींना चांगलं वाढवता येईल. लिहिणं वाचणं शिकवता येईल. आणखी मुलं झाली, तर खायला काय घालणार ?'

महेशला वाटे, मुलाशिवाय वंश टिकत नाही. आपण मेल्यावर आपल्याला अग्नी कोण देणार ? लता म्हणे, 'का बरं. मुलीने अग्नी दिला तर काय स्वर्ग मिळत नाही की काय ?'

लताला हसू येई. खरं तर लता वेगळीच होती. जी कुणी चांगलं काम करते, तिचं नांव युगानुयुगे रहातं. चांगले कामच वंशाला अजरामर करते. मग ते काम मुलगा करो, की मुलगी करो. शेवटी महेशला हे विचार पटले.

शाळेत लता बाईकडून गोष्टी ऐकत असे. झाशीची राणी लक्ष्मीबाई हिची गोष्ट. आजही ती गोष्ट तिला आठवते.

लक्ष्मी-सरस्वती मोठ्या होतील. शाळेत जातील. मला जे करता आलं नाही, ते मुलींना करता येईल, असा ती विचार करते.

शिक्षण कशाला म्हणतात, हे लताला समजलं आहे. शिक्षणाने आजारपण कोणतं आहे, ते समजतं. जातीपातीचा हलका विचार मनातून निघून जातो. शिवाशिवीचा हा विचारही मनात येत नाही. बाई कितीतरी गोष्टी लताला शिकवित असत. लताला सारे आठवत होते.

मुली हळूहळू मोठ्या झाल्या. लताने काम शोधायला सुरुवात केली. महेशच्या कमाईत कशीबशी हातातोंडाची गाठ पडते. लता मुलींना चांगलं



लता विचारते, 'का बरं ?
मुलीने अग्नी दिला तर स्वर्ग नाही मिळणार ?

जीवन देऊ पहात होती. जरा आणखी थोडे पैसे मिळाले, तर बरंच आहे. एकटा महेश किती कमावणार ?

लता इकडे-तिकडे काम शोधायला जाऊ लागली. एक दवाखाना होता. तिथे तिला काम मिळालं. दाईचं काम.

दिवसभर खूप काम पडे. पण महिना अखेरीला हातात चार पैसे येत. आपली कमाई. कष्टाची कमाई. लताला नवीनच विश्वास वाटू लागला.

काम मिळाले. लताला आणखी बरे वाटले. हिंमत वाढली. पण तोरा नाही. ती अधिकच काम करू लागली.

सासूलाही खुशी वाटली. लता दवाखान्यातून तिला औषध आणी. एकदा डॉक्टरही घरी येऊन लताच्या सासूला तपासून गेले.

लताची वागणूकच अशी होती की आजारी लोकांनाही आनंद वाटे. लता नर्सनाही आवडू लागली. तिला नर्सनी काही काम सांगितलं, की ती लगेच ते करी. अळमटळम करीत नसे. नेहमी हसतमुखाने काम करी.

कुणी लताला पैसे देऊ पहात. पण लता ते मुळीच घेत नसे.

'पैसे कशासाठी घेऊ ? दरमहा मला पगार मिळतो !'

एकदा काय झालं, गावातील सावकाराची बायको दवाखान्यात पंधरा दिवस होती. बरी होऊन घरी निघताना तिने लताला पाच रुपये देऊ केले.

लताने ते मुळीच घेतले नाहीत. घेतले नाहीत एवढंच नाही, ती म्हणाली, 'ताई, तुम्ही नर्सबाईंनाही असे पैसे दिलेत जणू !'

यामुळे सावकाराची बायको संतापली. यावर लता नरमाईने बोलली, 'कशासाठी रागवता हो ? मलाही नर्सबाईसारखा पगार भेटतो. जरा कमी असेल. ही तर माझी नोकरीच आहे.'



सावकारणीने लताला पैसे देऊ केलेत.

सावकाराच्या सुनेला वाटलं, 'लता दिमाख दाखवतेय. खरं तर लता वेगळीच बाई आहे. खरी आहे. तिला आपला अभिमान असला तरी ताठा नाही.

लता नवीन जीवनात अगदी रमली आहे. लता आणि महेश, दोघांचं एकमेकांवाचून पान हलत नाही. दिवसभर झटत रहातात. इमानेइतबारे काम करतात. बरे वाईटाची चाड ठेवतात.

दिवस मावळला की अंगणात बसतात. छोटं कुटुंब. पण जीवाला जीव देणारं. मायेची उब देणारं.

महेश लताला घरातील कामात मदत करतो. त्याला कमीपणा वाटत नाही. महेशची आईही हे पाहून सुखावते.

ती मुलाला सांगते, 'सूनबाई एवढं काम करते. तूही तिला हातभार लाव की जरा !'

ही आपली सासू नसून खरोखरच आई आहे असंच लताला वाटतं.

दिवसभर लता कामात असते. तरीही ती मऊपणे वागते. सांजेलाही तिचा चेहरा पाहून जणू शीतळ चांदणंच बरसतंय असं वाटतं. तिच्या आवाजात कुठेही कडूपणा नसतो.

ते सगळेच एकमेकांना जीव लावतात. त्याचं घर लहान असेल. पण मन अगदी आभाळासारखं मोकळं आहे.



या कुटुंबात
मायेची ऊब आहे.

# चावी

हालतू गावातला तोच सोनादिघी तलाव. लताचं लगीन होऊन वीस वर्षं लोटली. मधल्या काळात कितीतरी घटना घडल्या. नकुल कॉलरा होऊन देवाघरी गेला. वेळेवर डॉक्टरकडे गेला नाही, म्हणून असं झालं.

सोनाचं लग्न झालं. लताही तेव्हा आली होती. सोना वयाने मोठा झाला. बिजलीचा मिस्त्री झाला. चांगलं काम करी.

नंतर त्याला अधिक पैसे मिळवायची चटक लागली. हळूहळू तो खोटेपणा करू लागला. सहा रुपये किमतीचा माल 'आठ रुपयांचा आहे' असं सांगायला शिकला. पकडला गेला, की नोकरीवरून काढून टाकीत. मग तो नवीन नोकरी धरी. असं त्याचं चाललं होतं.

एकदा माणसाला खोटेपणाने वागायची सवय लागली, की तो सुधारणं अवघड. सोनाने घरी रेडिओ आणला. टेप ऐकायचं यंत्र आणलं.

सोनाच्या आईला वाटे, लेक किती पैसा कमावतोय, वा ! पण लोकांना ठकवून तो पैसे मिळवतोय, हे तिला ठाऊक नव्हतं. सोनावरचं तिचं प्रेम आंधळं होतं.

हळूहळू सोनाचे पाऊल नेहमीच वाकडे पडू लागले. त्याच्या हावरटपणाला सीमा राहिली नाही. धनिकांकडे जे जे असतं, ते ते हवं, असं त्याला वाटू लागलं. साधेपणातही सुख असतं, हे सोनाला समजलं नाही.

अधिक पैसे मिळवावे या हेतूने तो बायकोला घेऊन मुंबईला गेला. नंतर

अरबांच्या देशात गेला. नंतर सोनाचं काय झालं, याची काहीच खबरबात नाही.

इकडं सोनाची आई आता थकली होती. घरोघरी जाऊन काम करायला बळ राहिलं नाही. त्यात तिला वाताचा त्रास होऊ लागला. सांधे दुखत. घराच्या कोपऱ्यात ती पडून असे. तिची देखभाल करायला जवळ कुणी नसायचं.

रोज सांजेला सोनाची आई दिवा लावी.

तिच्या डोळ्यात मोतीबिंदू झाला. तिला नीट दिसत नसे. तरीही ती



लताची आईला वाटे, मुलगा खूप कमावेल. घरी परतेल.

सोनाची बसून वाट बघत राही. सोना कधी येईल? सोना कधी घरी परतेल?

ती विचार करी, खूप-खूप पैसे घेऊन आपला मुलगा घरी परत येईल. मोठं घर बांधील. पंखा, विजेचे दिवे-काय काय घरात आणील !

असा काळ जात असताना सोनाची आई खूप आजारी पडली. वाडीच्या लोकांना वाटलं आता हिची वेळ आली. पण थकली तरी ती चिवट होती. सारखी, 'सोना, माझा सोना !' असा जप करीत असे.

शेजारील लालूला अचानक लताची आठवण झाली. लताताई नोकरी करते असं तो ऐकून होता. आमतला गावाजवळचाच एका दवाखाना. दाईचं काम. लालूने विचार केला, लताताईला आईची खबर सांगावी.

गावातला दवाखाना. दोन मजली इमारत. दुपारचं काम आटोपून लता घरी निघणार होती. तोच चौकीदार येऊन लताला सांगू लागला, 'ताई, हालतू गावाहून तुम्हाला भेटायला एक मुलगा आलाय्.'

लताचं मन आनंदाने नाचू लागलं. हालतू गावाहून एक मुलगा आलाय्. तो आपला भाऊ सोनाच असणार, असं तिला वाटलं. किती काळ झाला, भावाची भेट नाही. भाऊ चांगले पैसे मिळवतो, परदेशी असतो, एवढंच लताला ठाऊक होतं.

लता लगबगीने जिना उतरून खाली आली. पण चौकीदाराजवळ तर दुसराच कुणी मुलगा उभा आहे. लता जागीच थबकली. मनातला आनंद विरून गेला.

त्या मुलाला लता ओळखू शकली नाही. लालूने आपली ओळख सांगितली. नंतर आईच्या आजारपणाची खबर दिली.

आई आजारी आहे हे कळले.
लताचे मन झाकोळून गेले.



लताचे मन काळजीने भरून गेले. आई आजारी आहे, हे तिला आताच कळलं. कळताच तिला खूप अपराधी वाटलं.

काही दिवसांची रजा घेऊन लता आईकडे गेली. डॉक्टरना बोलावलं. औषध दिलं. लताची आई थोडी बरी झाली. उठून बसू लागली.



लताला परत जायचं होतं. आईने एकटीनेच गावाकडे रहावं, हे तिला बरं वाटेना.

लताची आई म्हणाली, 'मुलीच्या घरी कधी आई रहाते का?'

'का राहू नये? मुलगा काय किंवा मुलगी दोघेही तिच्या पोटचीच



अंगणातील चटईवर
दोघी पहुडत — लताची आई आणि सासू.

असतात नां ? लताने मनातले बोलून दाखवले.

काळाबरोबर रीती-रिवाज बदलतात. विचार बदलतात. काळ एका जागी कधीही थांबत नाही. तसं असतं, तर सगळे अजूनही आदिमानवाच्या युगातच राहून गेले असते.

जुने रीतिरिवाज कवटाळून बसलो तर आज आपण मागे पडतो. लताने हे समजावलं. पण आईला ते पटलं नाही. मग लता मागेच लागली.

लता आईला घेऊन घरी परत आली. लताला वाटे, आईची काळजी घेण्याची जबाबदारी फक्त सोनाचीच नाही, आपलीही आहे.

लताच्या आईला भेटून लताच्या सासूला खूप आनंद झाला. लहानपणी तिची बहीण देवाघरी गेली होती. जणू आपली ती बहीणच परत मिळाली, असं सासूबाईंना वाटलं.

गावात वीज आली, तरी त्यांना अजून ती घेता आली नव्हती. लताच्या मुली कंदिलाच्या उजेडात अभ्यास करीत.

लताची आई आणि सासू बाहेर अंगणात चटई टाकून पहुडत. दोन दिवसांतच त्यांची अगदी गट्टी झाली. दोघीही गत जीवनातील आठवणीत रमून जात, नेहमी वळून मागे गेलेले दिवस आठवावेसे वाटत.

कामातून सवड मिळाली, की लता त्यांच्याकडे पाही. आणि तिला खूप बरं वाटे.

असाच काळ चालला होता. पहाता पहाता सहा वर्षं उलटली. लताची आई याच कुटुंबातली एक झाली.

थंडीचे दिवस होते. लताच्या आईला अचानक ताप आला. तो काही उतरेना. दवाखान्यातून डॉक्टर आले.

‘हा तर न्यूमोनिया आहे,’ डॉक्टर म्हणाले. या वयात हा आजार. आणि तोही खेडेगावात. लताची आई यावेळी खूपच गंभीर आजारी पडली.

लताच्या आईला बेचैन वाटू लागलं. जणू शेवट जवळ आला. वारंवार तिला हालतूचं घर आठवे. सोनादिघीचं तळं आठवे. सोनाची अगदी झरझरून आठवण येई. त्याच्यासाठी ती खूप कासावीस होई.

लता सैरभैर झाली. सोनाचा पत्ता ठाऊक नव्हता. त्याला कसे कळवणार ? लताला कळून चुकलं, की आता वेळ झाली आहे.

लताच्या आईला काहीतरी बोलायचं होतं. लताने आईजवळ डोकं वाकवलं. आणि कान देऊन ऐकू लागली.

‘माझ्या पत्र्याच्या पेटीत एक चावी आहे. हालतूच्या घराची चावी.’ एवढं बोलून लताच्या आईने मोठा श्वास घेतला.

थोडं थांबून ती म्हणाली, ‘ती चावी तू सोनाला दे.’ हेच तिचे शेवटचे बोल होते.

काही क्षणांनंतर लताची आई देवाघरी गेली. मुखात गंगाजळ घातले ते लतानेच.

लताच्या डोळ्यांत पाणी आलं. मुलींना जवळ घेऊन ती रडू लागली. लताच्या सासूला खूप असहाय वाटू लागलं. गेली काही वर्ष त्या दोघींची अगदी दाट जोडी जमली होती. लताची सासू सुन्न होऊन एका कोपऱ्यात बसली.

लताच्या आईला स्मशानात नेले. महेशबरोबर लताही तिथे गेली. दहन करायची वेळ आली. अग्नी देण्यासाठी महेशने चूड पेटवली. लताने ती चूड महेशच्या हातातून काढून घेतली. कुणी काही म्हणायच्या आतच लताने

आईच्या मुखाला अग्नी दिला. धाड धाड करून चिता पेटली.

सगळी राख होऊन गेली. काहीही मागे राहिलं नाही. घरी येऊन लताने ती चावी शोधून ठेवली. सोना कधीकाळी घरी परत आला, तर त्याला देण्यासाठी लताने ती चावी जपून ठेवली.

आईच्या अखेरच्या दिवसांतली काठी होती लता. तिनेच आईला शेवटी सांभाळलं. तरीही तिच्या घराची चावी लतासाठी नव्हती. असा हा समाज ! अशी ही लताच्या जीवनाची थट्टा !

लताने महेशच्या हातातील चूड काढून घेतली
तिने आईची चिता पेटविली.



